दिनांक ०५ ते १२ नोव्हेंबर या कालावधीत 'पक्षी सप्ताह' साजरा करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक : डब्लयूएलपी/१०२०/प्र.क्र.१९७/फ-१
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. २७ ऑक्टोबर, २०२०

प्रस्तावना :

राज्यातील जैवविविधतेचे संरक्षण व संवर्धनाच्या दृष्टीने निसर्गातील प्रत्येक घटकांचे महत्व विषद व्हावे, लोकजागृती व्हावी याकरिता शासन प्रयत्नशील आहे. राज्य प्राणी, पक्षी, वृक्ष, फूल, फुलपाखरू, कांदळवन वृक्ष अशी मानचिन्हे शासनाने घोषित केली आहेत. पक्षी हा सृष्टीतील महत्वाचा घटक आहे. जगभरातील पक्ष्यांची जैवविविधता झपाट्याने कमी होत असल्याचे दिसून येत असून अनेक पक्षी प्रजाती दुर्मिळ श्रेणीत समाविष्ट होत आहेत. राज्यातील पक्ष्यांचे महत्व प्रत्येक नागरीकापर्यंत पोहचवून त्यांच्या संरक्षणाप्रती जबाबदारी स्पष्ट व्हावी ह्यासाठी व्यापक जनजागृती होण्याची गरज आहे.

देशात आणि राज्यात पक्षी संवर्धन, संशोधनाच्या क्षेत्रात व्यापक काम झालेले आहे. भारतीय पक्षीविश्व व पक्षीअभ्यासशास्त्रास जागतिक स्तरावर पोहोचवणारे पद्मभूषण (स्व.) डॉ. सलीम अली हे एक आदरणीय नाव आहे. महाराष्ट्र राज्यातील वन्यजीव विषयक साहित्य निर्मितीत अग्रणी असणारे साहित्यिक व सेवानिवृत्त वनाधिकारी श्री. मारुती चितमपल्ली यांचेही नाव ह्या क्षेत्रात आदराने घेतले जाते. (स्व.) डॉ. सलीम अली यांच्या ' द बुक ऑफ इंडियन बर्डस् ' च्या आधारावर अनेक पक्षीमित्र वाटचाल करीत आहेत तर श्री. मारुती चितमपल्ली यांचे वन्यजीव विषयक साहित्य वाचून महाराष्ट्रातील अनेकजण पक्षी व वन्यजीव अभ्यास व संवर्धनाकडे वळले आहेत. योगायोगाने या दोघांचा जन्मदिवस हा नोव्हेंबर महिन्यात येतो आणि नोव्हेंबर महिन्याचा काळ हा पक्षी स्थलांतराच्या दृष्टीने महत्वाचा आहे. श्री. मारुती चितमपल्ली यांचा जन्मदिन दि. ०५ नोव्हेंबर असून (स्व.) डॉ. सलीम अली यांची जयंती दि. १२ नोव्हेंबरला असते. श्री. मारुती चितमपल्ली यांचा जन्मदिन व (स्व.) डॉ. सलीम अली यांच्या जयंतीचे औचित्य साधून दि. ०५ नोव्हेंबर ते १२ नोव्हेंबरपर्यंतचा आठवडा ' पक्षी सप्ताह ' म्हणून साजरा करण्यात यावा अशी अनेक पक्षीप्रेमी संस्थांकडून व राज्य वन्यजीव मंडळातील सदस्यांकडून मागणी होत होती. सदर मागणी विचारात घेऊन राज्य वन्यजीव मंडळाच्या १५ व्या बैठकीत झालेल्या चर्चेनुसार दरवर्षी दि. ०५ ते १२ नोव्हेंबर हा कालावधी ' पक्षी सप्ताह ' म्हणून साजरा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

श्री. मारुती चितमपल्ली यांचा जन्मदिन व (स्व.) डॉ. सलीम अली यांच्या जयंतीचे औचित्य साधून दि. ०५ नोव्हेंबर ते १२ नोव्हेंबर हा कालावधी दरवर्षी ' पक्षी सप्ताह ' म्हणून साजरा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर सप्ताहामध्ये खालीलप्रमाणे उपक्रम आयोजित करण्यात यावेत:-

i. पक्ष्यांचे निसर्गातील महत्व, संकटग्रस्त/ धोकाग्रस्त पक्षी व त्यांचे अधिवास, पक्ष्यांचे स्थलांतर, त्यांच्या अधिवासाचे संरक्षण, पक्षी संरक्षण व संवर्धन कायद्यांविषयी माहिती सर्वसामान्य नागरीकांपर्यंत पोचवण्यासाठी जनजागृती कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

ii. सर्वसामान्य नागरिकांसाठी पक्षी छायाचित्र प्रदर्शन, पक्षी छायाचित्र स्पर्धा आयोजित करण्यात याव्यात.

iii. शालेय विद्यार्थ्यांकरिता चित्रकला, निबंध स्पर्धा, छायाचित्र प्रदर्शनी, कार्यशाळा, माहितीपट इत्यादी कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

iv. पक्षी विषयक माहितीपत्रके, माहिती पुस्तके, भित्तीपत्रके इत्यादी प्रसिध्दी साहित्य प्रकाशित करून जनजागृती करण्यात यावी.

v. स्थानिक पक्षी तसेच स्थलांतरीत पक्ष्यांचे अधिवास, जसे- पाणथळी, तलाव, धरण, जंगल इ. ठिकाणी पक्षीनिरीक्षण कार्यक्रमांचे आयोजन करून, पक्षी गणना, अधिवास स्वच्छता, पक्षी अभ्यास असे कार्यक्रम आखण्यात यावेत.

vi. पक्षी व त्यांच्या अधिवासाच्या संरक्षणाच्या दृष्टीने जलसंपदा, कृषी व पोलीस विभाग हे महत्वाचे विभाग असल्याने त्यांना तसेच इतर शासकीय यंत्रणांना यात सहभागी करुन घ्यावे.

२. प्रधान मुख्य वन संरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर ' पक्षी सप्ताह ' साजरा करण्याबाबतच्या सविस्तर सूचना त्यांच्या स्तरावर निर्गमित कराव्यात.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२७१६२४३८४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2020.10.27 16:26:41 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (वने), यांचे खासगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (वने), यांचे खासगी सचिव
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (वने) व पर्यावरण विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली
६. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण आणि क्रीडा विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
१०.प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
११.सचिव, कृषी विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

१२.प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१३.प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४.सदस्य सचिव तथा प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळ, नागपूर
१५.अपर प्रधान मुख्य वन संरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई
१६.सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक
१७.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
१८. राज्य वन्यजीव सल्लागार मंडळाचे सर्व सदस्य
१९.मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव तथा प्रादेशिक) सर्व
२०.वनसंरक्षक (वन्यजीव तथा क्षेत्र संचालक) सर्व
२१.उप वनसंरक्षक (वन्यजीव तथा प्रादेशिक) सर्व
२२.सर्व विभागीय वनाधिकारी
२३.सर्व उप विभागीय वनाधिकारी
२४.निवडनस्ती फ-१ कार्यासन.